**राज्य, जिल्हा व उपविभागीय प्रयोगशाळांकरिता आणि राज्य, विभाग व जिल्हा स्तरीय संनियंत्रण कक्षाकरिता आवश्यक असलेल्या मनुष्यबळाबाबत ....**

महाराष्ट्र शासन

**पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः डब्ल्यूक्यूएम-२०१४/ प्र. क्र. ५९/ पापु-१२**

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, ७ वा मजला, लोकमान्य टिळक मार्ग,
मुंबई - ४०० ००१
तारीख: २३ फेब्रुवारी, २०१५

वाचा -

१) **शासन निर्णय क्रमांकः डब्ल्यूक्यूएम-२०१०/ प्र. क्र. ९५/ पापु-१२, दि. ०३.०३.२०१२**

२) **शासन निर्णय क्रमांकः डब्ल्यूक्यूएम-२०१२/ प्र. क्र. १८८/ पापु-१२, दि. २६.११.२०१२**

३) **शासन निर्णय क्रमांकः डब्ल्यूएसएसडी- १२०११(११)/ ६/२०१४-डब्ल्यूएसडी(पापु-१२), दि. १६.०६.२०१४**

४) **शासन पत्र क्रमांकः डब्ल्यूक्यूएम-२०१४/ प्र. क्र. ९/ पापु-१२, दि. १६.०६.२०१४**

५) **शासन पत्र क्रमांकः डब्ल्यूक्यूएम-२०१४/ प्र. क्र. ९/ पापु-१२, दि. ०७.१०.२०१४**

६) **केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना** (Uniform Drinking Water Quality Monitoring Protocol)

७) **शासन निर्णय क्रमांक: डब्ल्यूक्यूएम-२०१४/ प्र. क्र. ०८/ पापु-१२, दि. १८.१२.२०१४**

प्रस्तावना -

सार्वजनिक आरोग्य विभागाच्या सनियंत्रणाखाली असलेल्या जिल्हा पाणी गुणवत्ता तपासणी प्रयोगशाळेतील कंत्राटी मनुष्यबळ तसेच उप विभागीय प्रयोगशाळा व या प्रयोगशाळेत कार्यरत असलेले कंत्राटी मनुष्यबळ, साहित्य पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या सनियंत्रणाखाली घेणेबाबतचा संदर्भाधीन शासन निर्णय दि.१८.१२.२०१४ रोजी निर्गमित करण्यात आला असून, सदर यंत्रणा भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेच्या अधिपत्याखाली सुरु करण्यात येत आहे. यासाठी राज्य, जिल्हा व उपविभागीय स्तरीय पाणी गुणवत्ता तपासणी प्रयोगशाळा स्थापन करणे व संनियंत्रण करणे यासाठी आवश्यक असलेल्या कंत्राटी मनुष्यबळास मंजुरी,

मनुष्यबळ भरती प्रक्रिया, प्रयोगशाळा सनियंत्रण, निधी वितरण इत्यादी बाबत सविस्तर मार्गदर्शक सुचना एकत्रितपणे शासन निर्णयाच्या स्वरुपात देण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

## शासन निर्णय-

पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षण कार्यक्रमांतर्गत पाणी गुणवत्ता तपासणी करण्यासाठी राज्यामध्ये १४८ उप विभागीय प्रयोगशाळा स्थापन करण्यास मंजुरी देण्यात आलेली आहे. या कार्यक्रमाच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांच्या संनियंत्रणाखाली १ राज्यस्तरीय प्रयोगशाळा व ३४ जिल्हास्तरीय प्रयोगशाळा यांना मान्यता देण्यात येत आहे व या प्रयोगशाळांच्या कंत्राटी मनुष्यबळास मंजुरी देण्यात येत आहे. तसेच पिण्याच्या पाण्याच्या गुणवत्तेचे संनियंत्रण करण्यासाठी राज्यस्तरीय, विभागस्तरीय व जिल्हास्तरीय पाणी गुणवत्ता संनियंत्रण कक्ष स्थापन करण्यास व त्यासाठीच्या कंत्राटी मनुष्यबळास मान्यता देण्यात येत आहे.

२. राज्यातील प्रयोगशाळांकरिता मंजूर कंत्राटी मनुष्यबळ

| अ. क्र. | मनुष्यबळ | ०१ राज्य प्रयोगशाळा | ३४ जिल्हा प्रयोगशाळा | १४८ उपविभागीय प्रयोगशाळा | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| १ | रसायनी | २ | ३४ | १४८ | १८४ |
| २ | अनुजैविक तज्ञ | १ | ३४ | १४८ | १८३ |
| ३ | प्रयोगशाळा सहाय्यक | ३ | ६८ | २९६ | ३६७ |
| ४ | डाटा एंट्री ऑपरेटर | २ | ३४ | १४८ | १८४ |
| ५ | प्रयोगशाळा मदतनीस | २ | ३४ | १४८ | १८४ |
| ६ | सँपलिंग असिस्टंट | २ | ६८ | २९६ | ३६६ |
| | एकूण | १२ | २७२ | ११८४ | १४६८ |

३. पाणी गुणवत्ता संनियंत्रण कक्ष : पाण्याच्या गुणवत्तेची माहिती संकलित करणे व सर्वकष नियंत्रणासाठी पाणी गुणवत्ता कक्ष स्थापन करण्यात येत आहे. या कक्षा अंतर्गत प्रयोगशाळेत पाणी नमुने तपासणीच्या कामाचे संनियंत्रण करण्यासाठी कायमस्वरुपी अधिकारी / कर्मचारी यांच्याव्यतीरीक्त फक्त मंजूर कंत्राटी मनुष्यबळ खालीलप्रमाणे

| अ. क्र. | मनुष्यबळ | राज्य स्तरीय संनियंत्रण कक्ष | विभाग स्तरीय संनियंत्रण कक्ष | जिल्हा स्तरीय संनियंत्रण कक्ष | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| १ | रसायनी | २ | ६ | ३४ | ४२ |
| २ | डाटा एंट्री ऑपरेटर | २ | १२ | ६८ | ८२ |
| ३ | मदतनीस | २ | ६ | ३४ | ४२ |
| | एकूण | ६ | २४ | १३६ | १६६ |

४. **कंत्राटी मनुष्यबळ भरती व निवड प्रक्रिया :** राष्ट्रीय ग्रामीण पाणी गुणवत्ता सनियंत्रण व सर्वेक्षण कार्यक्रमांतर्गत मंजूर कंत्राटी मनुष्यबळाची भरती करताना शैक्षणीक अर्हता व अनुभव प्राप्त उमेदवारांची लेखी परीक्षा ( डाटा एंट्री ऑपरेटर वगळून ) आणि डाटा एंट्री ऑपरेटर यांची कौशल्य चाचणी (Skill Test) घेण्यात यावी. लेखी परीक्षा / कौशल्य चाचणीमध्ये मिळालेल्या गुणांच्या आधारे १:१० ( सर्वोच्च गुण मिळविणारे १० उमेदवार ) या प्रमाणात उमेदवारांना मुलाखतीसाठी आमंत्रित करण्यात यावे. मुलाखतीमधील प्राप्त गुणानुक्रमानुसार उमेदवारांची निवड यादी (Selection List) व प्रतिक्षा यादी (Waiting List) करण्यात यावी. सर्व पदांकरीता १:५ या प्रमाणे प्रतिक्षा यादी (Waiting List) तयार करण्यात यावी.

कंत्राटी मनुष्यबळासाठी आवश्यक शैक्षणिक अर्हता, अनुभव व मानधनाचा तपशील **परिशिष्ट : १** येथे पहावा.

प्राप्त झालेल्या अर्जांच्या छाननीनंतर पात्र ठरलेल्या उमेदवारांसाठी (डाटा एंट्री ऑपरेटर वगळून) एकूण ५० गुणांची बहुपर्यायी वस्तुनिष्ठ लेखी परीक्षा व डाटा एंट्री ऑपरेटर यांची ५० गुणांची कौशल्य चाचणी राहील. या सर्व उमेदवारांची २५ गुणांची तोंडी परीक्षा घेण्यात येईल.लेखी परीक्षेमध्ये एकूण ५० प्रश्नांकरता १ तासाचा कालावधी राहील. डाटा एंट्री ऑपरेटर यांच्या कौशल्य चाचणीसाठी १५ मिनिटांचा कालावधी राहील.

**लेखी परीक्षा**

| अ. क्र. | विषय | गुण |
|---|---|---|
| १ | सामान्य ज्ञान | १० |
| २ | बौध्दिक व विश्लेषणात्मक क्षमता | १० |
| ३ | गणितीय क्षमता | १० |
| ४ | विषयाचे ज्ञान | १० |
| ५ | संगणकाचे ज्ञान | ०५ |
| ६ | स्थानिक बाबींचे ज्ञान | ०५ |
|  | एकूण | ५० |

**तोंडी परीक्षा**

| अ. क्र. | विषय | गुण |
|---|---|---|
| १ | किमान शैक्षणिक अर्हता | ५ गुण (टक्केवारीनुसार) |
| २ | उच्च शैक्षणिक अर्हता | ५ गुण (टक्केवारीनुसार) |
| ३ | अनुभव | १० गुण |
| ४ | व्यक्तीमत्व | ०५ गुण |
|  | एकूण | २५ गुण |

५. **निवड समितीची रचना:** कंत्राटी मनुष्यबळाची निवड करण्यासाठी खालील प्रमाणे निवड समिती गठित करण्यात आली आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | अध्यक्ष |
| २ | प्रादेशिक उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा | उपाध्यक्ष |
| ३ | मुख्य अनुजैविकशास्त्रज्ञ, जिल्हा आरोग्य प्रयोगशाळा | सदस्य |
| ४ | सहायक प्रशासन अधिकारी , उपसंचालक कार्यालय , भू.स .वि.यं. | सदस्य |
| ५ | सहाय्यक रसायनी, प्रादेशिक उपसंचालक कार्यालय,भू.स.वि.यं. | सदस्य |
| ६ | अवर सचिव (पापु-१२), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग | सदस्य |
| ७ | जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा | सदस्य सचिव |

६. **जाहिरात प्रक्रिया व नेमणूक आदेश :** विभागीय व जिल्हा संनियंत्रण कक्ष आणि जिल्हा व उपविभागीय प्रयोगशाळेसाठी कंत्राटी पध्दतीने भरावयाच्या पदांसाठीची जाहिरात संक्षिप्त स्वरुपात, सर्वाधिक खपाच्या एक स्थानिक व एक राज्य स्तरीय दैनिक वृत्तपत्रात जिल्हा स्तरावरून जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक यांनी देण्यात यावी. राज्य प्रयोगशाळा व राज्य संनियंत्रण कक्षासाठी कंत्राटी पदांसाठीची जाहिरात प्रादेशिक उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांनी देण्यात यावी. या करिता येणारा खर्च पाणी गुणवत्ता सनियंत्रण व सर्वेक्षण कार्यक्रमांअंतर्गत प्राप्त होणाऱ्या निधी मधून भागविण्यात यावा.

विभागीय व जिल्हा संनियंत्रण कक्ष आणि जिल्हा व उपविभागीय प्रयोगशाळेसाठी निवड केलेल्या कंत्राटी उमेदवारांची नेमणूक, गरजेनुसार प्रतिक्षा यादीतील उमेदवारांची नेमणूक व पुनर्नियुक्ती, प्रादेशिक उपसंचालक भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा हे करतील. राज्य प्रयोगशाळा व राज्य संनियंत्रण कक्षासाठी कंत्राटी उमेदवारांची नेमणूक, गरजेनुसार प्रतिक्षा यादीतील उमेदवारांची नेमणूक व पुनर्नियुक्ती हे प्रादेशिक उपसंचालक भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे करतील. नियुक्तीचे

आदेशाच्या सात दिवसाच्या कालावधीत उमेदवाराने हजर होणे अनिवार्य आहे. सात दिवसापेक्षा जास्त कालावधी नंतर नियुक्ती आदेश आपोआप रद्द होतील व प्रतीक्षायादीतील गुणांकनानुसार पुढील उमेदवाराची नेमणूक करण्यात यावी.

७. **कंत्राटी पदांचे मानधन व करारनामा :** कंत्राटी पध्दतीने भरावयाच्या मनुष्यबळासाठी ठोक मानधन अनुज्ञेय राहील. संबंधितांसमवेत करारनामा करुन ०६ महिने व ०५ महिने या प्रमाणे दोन टप्प्यात तीन कार्यालयीन दिवसाचा तांत्रिक खंड देऊन ११ महिन्यांसाठी कंत्राटी पध्दतीने नियुक्ती करण्यात यावी. कंत्राटी पध्दतीने नियुक्ती/ मुदतवाढ देताना विहित नमुन्यातील रु. १००/- च्या मुद्रांकपत्रावर बंधपत्र करण्यात यावे. बंधपत्राचा नमुना **परिशिष्ट : २** येथे पहावा.

८. **कंत्राटी पदांचे कार्यमूल्यमापन :** कंत्राटी कर्मचाऱ्यांसोबतचा दुसऱ्या टप्प्यातील ०५ महिन्याचा करार संपुष्टात येण्यापूर्वी किमान दोन महिने आधी राज्य प्रयोगशाळा व राज्य संनियंत्रण कक्षासाठी प्रादेशिक उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांनी, विभागीय संनियंत्रण कक्षासाठी प्रादेशिक उपसंचालक यांनी आणि जिल्हा संनियंत्रण कक्ष, जिल्हा प्रयोगशाळा व उपविभागीय प्रयोगशाळा यांचे जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक यांनी कार्यमूल्यमापन आढावा प्रक्रिया सुरू करुन ही प्रक्रिया करार संपूष्टात येण्यापूर्वी पूर्ण करावी. कंत्राटी पध्दतीने नियुक्त केलेल्या कर्मचाऱ्यांचे कार्यमूल्यमापन करून काम समाधानकारक आढळल्यास त्यांना तीन कार्यालयीन दिवसांचा तांत्रिक खंड देऊन पुढील ०६ महिने व ०५ महिने या प्रमाणे दोन टप्प्यात मुदतवाढ देता येईल.

९. **कर्तव्ये व जबाबदाऱ्या :** कार्यक्रम कालावधीमध्ये मंजूर कंत्राटी कर्मचाऱ्यांकडे पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षण कार्यक्रम अंमलबजावणी व्यतिरिक्त अन्य कोणतीही कामे सोपविण्यात येणार नाहीत तसेच त्यांच्याकडे इतर पदांचा अतिरिक्त कार्यभार सोपविण्यात येणार नाही याची जबाबदारी प्रादेशिक उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांची राहील. कंत्राटी मनुष्यबळाच्या कर्तव्ये व जबाबदाऱ्या **परिशिष्ट : ३** येथे नमूद केल्या आहेत.

१०. **अनुज्ञेय रजा :** कंत्राटी मनुष्यबळास प्रतिवर्षी (कॅलेंडर वर्षानुसार) ८ (आठ) दिवस नैमित्तीक रजा आणि १० (दहा) दिवस वैद्यकीय रजा अनुज्ञेय राहील. कॅलेंडर वर्षामधील सेवा अवधीच्या प्रमाणात रजा अनुज्ञेय राहतील. रजेबाबत पूर्व परवानगी घेणे आवश्यक आहे व एका वेळेस तीन दिवसापेक्षा जास्त कालावधीची नैमित्तिक रजा घेता येणार नाही.

११. **प्रवास व दैनिक भत्ता :** कंत्राटी मनुष्यबळाने शासकीय कामासाठी (प्रशिक्षण, बैठक, कार्यशाळा, प्रासंगिक) प्रत्यक्ष केलेल्या प्रवासासाठी पुढीलप्रमाणे प्रवास व दैनिक भत्ता मानधना व्यतिरिक्त अनुज्ञेय राहील.

| अ.क्र | मनुष्यबळ | अनुज्ञेय दर |
|---|---|---|
| १ | रसायनी व अनुजैविक तज्ञ | रू. ४२००/- व रु ४३००/- ग्रेड वेतन घेणाऱ्या गट 'क' मधील शासकीय कर्मचाऱ्यांना अनुज्ञेय असलेल्या दराने |
| २ | डाटा एन्ट्री ऑपरेटर, प्रयोगशाळा सहाय्यक, प्रयोगशाळा मदतनीस / मदतनीस व सॅंपलिंग असिस्टंट | रू. ४२००/- पेक्षा कमी ग्रेड वेतन घेणाऱ्या गट 'क' मधील शासकीय कर्मचाऱ्यांना अनुज्ञेय असलेल्या दराने |

१२. **ओळखपत्र :** राज्य प्रयोगशाळा व राज्य संनियंत्रण कक्षासाठीच्या कंत्राटी तत्वावर नियुक्त होणाऱ्या कर्मचाऱ्यांना प्रादेशिक उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांनी, विभागीय संनियंत्रण कक्षासाठीच्या कंत्राटी तत्वावर नियुक्त होण-या कर्मचाऱ्यांना प्रादेशिक उपसंचालक यांनी आणि जिल्हा संनियंत्रण कक्ष, जिल्हा व उपविभागीय प्रयोगशाळासाठीच्या कंत्राटी तत्वावर नियुक्त होण-या कर्मचाऱ्यांना जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक यांनी त्यांच्या स्वाक्षरीने **परिशिष्ट : ४** प्रमाणे विहित नमुन्यानुसार ओळखपत्र देण्यात यावे. सेवा समाप्तीच्या वेळी सदर ओळखपत्र कार्यालय प्रमुखाकडे जमा करणे सर्व कंत्राटी कर्मचाऱ्यांवर बंधनकारक राहील.

१३. **राजीनामा :** कंत्राटी पदांवरील नियुक्त कर्मचाऱ्यांना करारनाम्याच्या कालावधीमध्ये राजीनामा द्यावयाचा असेल तर त्यासाठी एक महिना आधी लेखी पूर्व सूचना द्यावी लागेल. राजीनामा देण्यासाठी एक महिना आधी लेखी पूर्व सूचना न दिल्यास एक महिन्याचे मानधन चलनाद्वारे भरणा करावे लागेल.

उपरोक्त अनुक्रमांक ०६ ते १३ मुद्यांबाबतच्या कार्यवाहीची जबाबदारी संबंधीत कार्यालयाच्या आस्थापना शाखेची राहील.

१४. **मानधन अदायगी :** केंद्र शासन अर्थ सहाय्यीत पाणी गुणवत्ता सनियंत्रण व सर्वेक्षण कार्याक्रमांतर्गतच्या भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांच्या प्रयोगशाळाकरिता मंजूर असलेल्या पदांचे मानधन राज्य प्रयोगशाळा व राज्य संनियंत्रण कक्षासाठी प्रादेशिक उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे , विभागीय संनियंत्रण कक्षासाठी प्रादेशिक उपसंचालक आणि जिल्हा संनियंत्रण कक्ष, जिल्हा प्रयोगशाळा व उपविभागीय प्रयोगशाळा यांचे जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक यांच्या मार्फत करण्यात यावे. या करिता आवश्यक असलेले बचत खाते जिल्हा स्तरावर वरिष्ठ भूवैज्ञानिक व उपलेखापाल यांच्या संयुक्त स्वाक्षरीने, विभागीयस्तरावर प्रादेशिक उपसंचालक व लेखाधिकारी यांच्या संयुक्त स्वाक्षरीने, तसेच राज्य स्तरावर संचालक व सहाय्यक संचालक यांच्या संयुक्त स्वाक्षरीने राष्ट्रीयकृत बँकेत पाणी गुणवत्ता सनियंत्रण व सर्वेक्षण कार्यक्रम या नावे काढण्यात यावे.

१५. **निधी वितरण व उपयोगीता प्रमाणपत्र :** शासनामार्फत वितरीत केलेला निधी संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे याच्याकडे असलेल्या पाणी गुणवत्ता या विषयाकरीताच्या राष्ट्रीयकृत बँकेच्या बचत खात्यात वर्ग करण्यात येईल. सदर निधी संचालक स्तरावरून, प्रादेशिक उपसंचालक व प्रादेशिक उपसंचालक यांच्या स्तरावरून जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक यांच्या खात्यात वर्ग करण्यात यावा.

तसेच पाणी गुणवत्ता सनियंत्रण व सर्वेक्षण अंतर्गत प्राप्त झालेल्या निधीचे उपयोगीता प्रमाणपत्र (Utilization Certificate) व लेखा विवरण अहवाल (ASA), नोंदणीकृत सनदी लेखापाल यांच्या स्वाक्षरीने, जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक यांनी प्रादेशिक उपसंचालक यांना व प्रादेशिक उपसंचालक यांनी संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांच्याकडे मागील संपलेल्या वर्षातील एकत्रित

स्वरुपात जमा करण्यात यावे आणि संचालक स्तरावरून, शासनाकडे जमा करण्यात यावेत व त्याची एक प्रत महालेखाकार, मुंबई, महाराष्ट्र राज्य यांना पाठविण्यात यावी.

१६. **प्रयोगशाळेसाठी आवश्यक साहित्य इ. ची खरेदी :** राज्यस्तरीय प्रयोगशाळेकरिता आवश्यक असलेली रसायने, काचेचे साहित्य, सयंत्रे, उपकरणे व प्रयोगशाळेशी संबंधीत इतर साहित्य खरेदीचे (भांडवली व आवर्ती खर्च) सर्व आधिकार हे प्रादेशिक उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना राहतील. जिल्हा व उप विभागीय प्रयोगशाळेकरीता आवश्यक असलेली रसायने, काचेचे साहित्य, सयंत्रे, उपकरणे व प्रयोगशाळेशी संबंधीत इतर साहित्य खरेदीचे (भांडवली खर्च) सर्व आधिकार हे प्रादेशिक उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांना राहतील व या प्रयोगशाळांकरीता आवश्यक असलेली रसायने, काचेचे साहित्य व प्रयोगशाळेशी संबंधीत इतर साहित्य खरेदीचे (आवर्ती खर्च) सर्व आधिकार हे जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक यांना राहतील. प्रादेशिक उपसंचालक व जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांनी विहित खरेदी प्रक्रियेचा अवलंब करून सदर खरेदी करण्यात यावी व केलेल्या कार्यवाहीचा अहवाल संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांच्या मार्फत शासनास सादर करण्यात यावा.

उपरोक्त अनुक्रमांक १४ ते १६ या मुद्यांबाबतच्या कार्यवाहीची जबाबदारी संबंधीत कार्यालयाच्या लेखा शाखेची राहील.

१७. **पाणी नमुने गोळा करणे :** ग्रामपंचायत स्तरावरील जल सुरक्षक यांनी पिण्याच्या पाण्याचे नमुने गोळा करून ते संबंधीत प्राथमिक आरोग्य केंद्राकडे देण्यात यावेत, प्राथमिक आरोग्य केंद्राकडून भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांच्या अधिनस्त राज्य, जिल्हा व उपविभागीय प्रयोगशाळेकडे पाठविण्यात यावेत. पाणी नमुने संबंधित प्रयोगशाळेत पोहोच होतील याची जबाबदारी जिल्हा परिषदेतील, जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन अंतर्गतच्या पाणी गुणवत्ता कक्षाची राहील.

१८. **पाणी गुणवत्ता तपासणी अहवाल :** पाणी गुणवत्ता तपासणीचे मासिक व वार्षिक अहवाल जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक यांनी प्रादेशिक उपसंचालक यांना व प्रादेशिक उपसंचालक यांनी संचालक, भूजल

सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांच्याकडे एकत्रित स्वरुपात पाठविण्यात यावे व संचालक स्तरावरून ते शासनाकडे पाठविण्यात यावे. पाणी गुणवत्ता तपासणी प्रयोगशाळेत तपासण्यात येणाऱ्या घटकांचा सविस्तर तपशील **परिशिष्ट : ५** येथे पहावा.

**१९. संनियंत्रण :** प्रयोगशाळांचे संनियंत्रण करण्यासाठी संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांच्या स्तरावर उपसंचालक (जल विज्ञान प्रकल्प) यांना राज्य समन्वय अधिकारी, विभागीय स्तरावर प्रादेशिक उपसंचालक हे विभागीय समन्वय अधिकारी व जिल्हास्तरावर जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक हे जिल्हा समन्वय अधिकारी म्हणून काम पाहतील. सदर कामाचे संनियंत्रण राज्य, विभागीय व जिल्हा संनियंत्रण कक्षामार्फत करण्यात येईल.

**२०. सेवा :** कंत्राटी पध्दतीने नियुक्त केलेल्या सर्व नेमणूका करार संपल्याच्या दिनांकास आपोआप संपूष्टात येतील. कंत्राटी तत्वावर नेमलेल्या कर्मचाऱ्यांना या कंत्राटी सेवेच्या आधारे शासनाच्या नियमित सेवेत सामावून घेतले जाणार नाही व याबाबत त्यांना न्यायालयात दाद मागता येणार नाही.

२१. पाणी गुणवत्ता विषयक कामकाजासाठी मंजूर व कार्यरत असलेल्या मनुष्यबळाची पुन: वेगळयाने मुलाखत न घेता दि. ३१.०३.२०१५ नंतर कार्यालयीन कामकाजाचा तीन दिवसांचा तांत्रिक खंड देऊन त्यांच्याबरोबर रु. १००/- च्या बंधपत्रावर ०६ महिने व ०५ महिने या प्रमाणे दोन टप्प्यात नव्याने करार करण्यात यावा.

२२. जलस्वराज्य प्रकल्पा अंतर्गत चंद्रपूर, अकोला, यवतमाळ व जळगाव या चार ठिकाणी स्थापन केलेल्या जिल्हा स्तरीय प्रयोगशाळेतील कार्यरत / मंजूर कंत्राटी मनुष्यबळाची केंद्र शासनाच्या Uniform Drinking Water Quality Protocol अनुसार उपरोक्त मुद्दा क्र. २ प्रमाणे नव्याने संरचना करण्यात यावी.

२३. भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेच्या ६ विभागीय प्रयोगशाळा या विभागीय प्रयोगशाळा म्हणून आणि जिल्हा प्रयोगशाळा म्हणून काम करणार असल्याने त्या प्रमाणात केंद्र शासनाच्या Uniform Drinking Water Quality Protocol अनुसार उपरोक्त मुद्दा क्र. २ प्रमाणे कंत्राटी पदांची नियुक्ती करण्यात यावी.

२४. **खर्च :** प्रयोगशाळांकरिता आवश्यक असलेली रसायने, काचेचे साहित्य, सयंत्रे, उपकरणे व प्रयोगशाळेशी संबंधीत इतर साहित्य तसेच प्रयोगशाळा व संनियंत्रण कक्षासाठीच्या मनुष्यबळाबाबत जाहिरात, मानधन, प्रवास व दैनिक भत्ता इत्यादी करिता होणारा खर्च केंद्र शासनाकडून प्राप्त होणाऱ्या राष्ट्रीय पाणी गुणवत्ता सनियंत्रण व सर्वेक्षण कार्यक्रमातून (३%) भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२२३१११६२२२०२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Garud Nandkishor M

Digitally signed by Garud Nandkishor M
DN: CN = Garud Nandkishor M, C = IN, S = Maharashtra, O = Govt. of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2015.02.24 11:16:22 +05'30'

**( नंदकिशोर गरुड )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय,मुंबई-४०० ०३२
२) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
३) प्रधान सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
४) उप सचिव व संचालक, (आर.एस.पी.एम.यु) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय,मुंबई.
५) विभागीय आयुक्त (सर्व)
६) जिल्हाधिकारी (सर्व)
७) संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे.
८) मुख्य कार्यकारी अधिकारी ,जिल्हा परिषद (सर्व)
९) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर, नरीमन पॉईट, मुंबई.
१०) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई.
११) संचालक, आरोग्य, आरोग्य संचालनालय, मुंबई.
१२) मुख्य अभियंता, राज्यस्तरीय भारत निर्माण कक्ष, बेलापूर, नवी मुंबई.
१३) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर
१४) अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई.

१५) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद (सर्व)
१६) गट विकास अधिकारी, पंचायत समिती (सर्व)
१७) सर्व कार्यासने पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८) निवड नस्ती पापु-१२

**परिशिष्ट क्र. १**

| अ. क्र. | पद | शैक्षणिक अर्हता | अनुभव | मानधन |
|---|---|---|---|---|
| १ | रसायनी | बी. एस्सी (रसायनशास्त्र),<br>MS-CIT उत्तीर्ण,<br>प्राधान्य -एम. एस्सी. (रसायनशास्त्र) | प्रयोगशाळेतील पाणी नमुने तपासणीचा /पाणी गुणवत्ता विषयक कामाचा किमान १ वर्षाचा अनुभव | १२०००/- |
| २ | अनुजैविक तज्ञ | बी. एस्सी (सूक्ष्मजीवशास्त्र)<br>MS-CIT उत्तीर्ण<br>प्राधान्य- एम. एस्सी. (सूक्ष्मजीवशास्त्र) | प्रयोगशाळेतील पाणी नमुने तपासणीचा /पाणी गुणवत्ता विषयक कामाचा किमान १ वर्षाचा अनुभव | १२०००/- |
| ३ | डाटा एन्ट्री ऑपरेटर | एच.एस.सी उत्तीर्ण,<br>MS-CIT उत्तीर्ण,मराठी व इग्रंजी टायपिंग अनुक्रमे ३० व ४० शब्द प्रति मिनिट व इंटरनेट वापराबद्दल माहिती, पदवीधर असणाऱ्यास प्राधान्य | प्रयोगशाळेतील पाणी नमुने तपासणीचा /पाणी गुणवत्ता विषयक माहितीच्या नोदी घेण्याच्या कामाचा किमान १ वर्षाचा अनुभव | १००००/- |
| ४ | प्रयोगशाळा सहाय्यक | एच.एस.सी उत्तीर्ण (विज्ञान शाखा) व पदवीधर असणाऱ्यास प्राधान्य | प्रयोगशाळेतील पाणी गुणवत्ता विषयक काम करणाऱ्यास प्राधान्य | ८०००/- |
| ५ | प्रयोगशाळा मदतनीस / मदतनीस | दहावी उत्तीर्ण | प्रयोगशाळेतील पाणी गुणवत्ता विषयक काम करणाऱ्यास प्राधान्य | ६०००/- |
| ६ | सँपलिंग असिस्टंट | दहावी उत्तीर्ण | प्रयोगशाळेतील पाणी गुणवत्ता विषयक काम करणाऱ्यास प्राधान्य | ८०००/- |

# परिशिष्ट : २

## कंत्राटी तत्वावर नियुक्ती करताना घ्यावयाचा करारनामा नमुना

Address of the employer

-------------------------------------
-------------------------------------
-------------------------------------
Dated :- / /

To,

Shri / Smt. --------------------------------------------------
--------------------------------------------------

**Sub.:-** Contractual assignment as ------------------- *(Name of the post)* for ---------------- ------------------------------------------------Water Quality Monitoring & Surveillance Programme (WQM&SP)

1 Set out below are the terms and conditions under which **Mr./Ms. -------------------------------------------**is given this contractual assignment. His/her services on contract basis are presently required for ----------------------------------------------------------.

2 This Contractual assignment is given for a period of –––– months from the **date**

____________

3 Any decision taken on the basis of inputs pertaining to specific expertise possessed by the assignee appointed on contract, if results into a financial loss to the government, which if proved to have been caused due to lack of application of mind or dereliction of duty by him/her, the --------- shall have right to fix the responsibility upon him/her and recover the loss from him/her.

4 This contractual period of –––– months of the assignment may be shortened or terminated any time during this period depending upon the need and progress of the work. In the event of the termination of this assignment before the agreed period, he/she will be paid for the service rendered by him/her for carrying out the assignment till the date of termination of the contract and he/she will hand over his/her charge to the

person authorized by ------------------------ along with all the information and documentation possessed or gathered by him/her while rendering the service under this contract.

*5* His/her services will be exclusively utilized for -------- under overall superintendence, control and guidance of -------------------. ----------------- will have control over his/her daily work. He/She will perform his/her duties as per job chart/ roles and responsibilities appended with this and shall be subject to performance appraisal. However, ---------------- may assign him/her any other function, responsibility or task as regards the overall implementation of Water Supply and Sanitation Program in any part of the State.

*6* ---------------------- will pay him/her directly a fixed consolidated remuneration of Rs.**--------------------** *(Rupees ............)* per month during the contract period at the end of every month or part thereof on his/her satisfactory performance of the assignment for that month. The above rate is subject to deduction of any taxes, which are required to be lawfully deducted from his/her remuneration. The above remuneration may, positively, be changed by the Water Supply and Sanitation Deptt, if found necessary and it may be given effect at any point of time during this contract period.

7 No other remuneration, compensation or benefits are admissible to him/her for this contractual assignment.

8 If he/she desires to leave the assignment for any reason before the termination of contractual period, he/she will give **one months** notice or deposit equivalent remuneration in lieu of notice.

9 All materials produced or acquired under the terms of this agreement written, Digital/ Computerised, Software, Graphic, film, and magnetic tape or otherwise, shall remain the property of Water & Sanitation Support Organization. Water Supply and Sanitation Department retains the exclusive right to publish or disseminate reports arising from such materials. His/her responsibility and duties in this paragraph shall continue, notwithstanding the termination of this contract for the execution of its other provisions.

10 He/she also agrees that all knowledge and information not within the public domain which may be acquired during the carrying out of this contract, shall be for all the times

and for all purposes, regarded as strictly confidential and held in confidence and shall not be directly or indirectly disclosed to any person whatsoever, except with the prior approval of Water Supply and Sanitation Department, Government of Maharashtra.

**11 Clear understanding is given that, this is purely a contractual engagement and it is not a permanent job with Government of Maharashtra.**

12 **Mr/Ms. -------------------------------------------------------** hereby gives an undertaking that he/she will continue to serve the --------------------- for the said **period**. His/her consolidated pay for a period of one month will be retained by the ------------- and shall be paid to him/her after the completion of the said period. It will be forfeited if he/she leaves the Project before the completion of said period.

13 **Mr/Ms.** ------------------------------------------------will be given an Identity Card duly signed by ------------------- after his/her contractual assignment and he/she hereby agrees that the said Identity Card shall be returned to the ---------, ----------------- after his /her contractual period comes to an end or upon termination of his /her services whichever happens earlier, failing which legal action shall be initiated against him/her.

14 **Mr/Ms. -------------------------------------------------------**hereby agrees and gives undertaking that, he/ she shall not put along claim whatsoever to regularize her/him in a permanent service.

15 **Mr/Ms. ------------------------------------------------------------** hereby agrees to carry out his/her assignment for ------------- on above terms and conditions and assures to give his /her services, accordingly for the acceptance of which, he/she has put his/her signature below:

I agree and accept the assignment on above terms and conditions.

| | | |
|---|---|---|
| **Date-** | **Name (Candidate)-** | **Name (Sr.Geologist)** |
| **Place-** | **Sign.(Candidate)** | **Sign. (Sr.Geologist)** |

## परिशिष्ट : ३

## कर्तव्य व जबाबदाऱ्या

**रसायनी**

१. पाणी गुणवत्ता सनियंत्रण व सर्वेक्षण कार्यक्रमांतर्गत जिल्ह्यातील पिण्याच्या पाण्याची प्रतिदिन १० ते १५ नमुने रासायनिक तपासणी करणे.
२. दैनंदिन तपासणी झालेल्या रासायनिक नोंदी विहित नमुन्यात दररोज रजिस्टरमध्ये घेणे. रसायनी यांनी त्यांना देण्यात आलेल्या नोंद वह्या अद्यावत ठेवणे गरजेचे आहे. नमुना प्राप्त नोंद वही, पृथ:करण नोंद वही, निरीक्षण नोंद वही इ. तसेच केंद्र व राज्य शासनाच्या संकेतस्थळावर नोंद करून घेणे.
३. प्रयोगशाळेतील पाणी गुणवत्तेसंबंधीची माहिती उप मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्या अधिपत्याखाली काम करणारा पाणी गुणवत्ता कक्ष (पाणी गुणवत्ता तज्ञ व जिल्हा पाणी गुणवत्ता निरीक्षक) यांना देणे.
४. राज्य व जिल्हास्तरावरून वेळोवेळी देण्यात येणाऱ्या पाणी गुणवत्तेसंबंधी सूचनांचे पालन करणे.
५. अनुजैविक तज्ञ यांच्या अनुपस्थितीत रसायनी यांनी स्वतःच्या कामासोबत अनुजैविक तज्ञ यांची कामे पहावीत.
६. रसायनी यांनी सयंत्रे व उपकरणे चालू स्थितीत राहतील यांची काळजी घ्यावी. पृथक्करणासाठी आवश्यक द्रावणे व इतर रसायने रसायनी यांनी तयार करावीत. उपकरणे ,सयंत्रे व काच सामान स्वच्छ राहतील यांची दक्षता घेतील .
७. रासायनिक तपासणीचा विश्लेषणात्मक अहवाल दर महिन्याच्या ५ तारखेपर्यंत राज्य व विभागीय स्तरावर पाठविण्यात यावा.
८. राज्य, विभागीय व जिल्हा स्तरावरून वेळोवेळी आयोजित केलेल्या प्रशिक्षणास उपस्थित राहणे .

**अनुजैविक तज्ञ**

१. पाणी गुणवत्ता सनियंत्रण व सर्वेक्षण कार्यक्रमांतर्गत जिल्ह्यातील पिण्याच्या पाण्याची प्रतिदिन १० ते १५ नमुने अनुजैविक तपासणी करणे.
२. दैनंदिन तपासणी झालेल्या जैविक नमुन्यांच्या नोंदी विहित नमुन्यात दररोज रजिस्टरमध्ये घेणे. अनुजैविक तज्ञ यांनी त्यांना देण्यात आलेल्या नोंद वह्या अद्यावत ठेवणे गरजेचे आहे. नमुना प्राप्त

नोंद वही, पृथ:करण नोंद वही, निरीक्षण नोंद वही इ. तसेच केंद्र व राज्य शासनाच्या संकेतस्थळावर नोंद करून घेणे.

३. प्रयोगशाळेतील पाणी गुणवत्तेसंबंधीची माहिती उप मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्या अधिपत्याखाली काम करणारा पाणी गुणवत्ता कक्ष (पाणी गुणवत्ता तज्ञ व जिल्हा पाणी गुणवत्ता निरीक्षक) यांना देणे.
४. राज्य व जिल्हास्तरावरून वेळोवेळी देण्यात येणाऱ्या पाणी गुणवत्तेसंबंधी सूचनांचे पालन करणे.
५. रसायनी यांच्या अनुपस्थितीत अनुजैविक तज्ञ यांनी स्वतःच्या कामासोबत रसायनी यांची कामे पहावीत.
६. अनुजैविक तज्ञ यांनी जैविक तपासणीची सर्व उपकरणे चालू स्थितीत राहतील यांची काळजी घ्यावी. पृथक्करणासाठी आवश्यक काच सामान व नमुना बाटल्या निर्जंतुकीकरण करून ठेवावे व पृथक्करणासाठी आवश्यक मिडिया तयार करून ठेवणे.
७. अनुजैविक तपासणीचा विश्लेषणात्मक अहवाल दर महिन्याच्या ५ तारखेपर्यंत राज्य व विभागीय स्तरावर पाठविण्यात यावा.
८. राज्य, विभागीय व जिल्हा स्तरावरून वेळोवेळी आयोजित केलेल्या प्रशिक्षणास उपस्थित राहणे.

<u>डाटा एन्ट्री ऑपरेटर</u>

**१.** पाणी गुणवत्ता विषयक रासायनिक व अनुजैविक तपासणीच्या नोंदी केंद्र व राज्य शासनाच्या संकेतस्थळावर घेणे.
**२.** पाणी गुणवत्ता विषयक जिल्ह्यामध्ये पाणी गुणवत्ता विषयक होणारी प्रशिक्षणाच्या नोंदी केंद्र व राज्य शासनाच्या संकेतस्थळावर घेणे.
**३.** पाणी गुणवत्ता विषयक फिल्ड टेस्ट किट्स वितरण, फिल्ड टेस्ट किट्सचा वापर करून पाणी नमुना तपासणी केंद्र व राज्य शासनाच्या संकेतस्थळावर घेणे.
**४.** मासिक व वार्षिक रासायनिक व जैविक तपासणी विश्लेषणात्मक अहवाल तयार करणे
**५.** पाणी गुणवत्ता विषयीची माहिती उप मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्या अधिपत्याखाली काम करणारा पाणी गुणवत्ता कक्ष व राज्य स्तरावरील पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांना सॉफ्ट व हार्ड कॉपी मध्ये देणे.
६. राज्य, विभागीय व जिल्हा स्तरावरून आयोजित केलेल्या प्रशिक्षणास उपस्थित राहणे.
७. राज्य व जिल्हास्तरावरून वेळोवेळी देण्यात येणाऱ्या पाणी गुणवत्तेसंबंधी सूचनांचे पालन करणे.

**प्रयोगशाळा सहाय्यक**

१. प्रयोगशाळेसाठी आवश्यक असणारी सर्व द्रावणे तयार करणे.
२. रसायनी तसेच जैविक तपासणी करत असताना रसायनी व अनुजीव तज्ञ यांना मदत करणे.
३. नमुने प्राप्त  करून घेणे, प्राप्त नमुन्यांच्या नोंदी नोंदवहीत घेणे .
४. प्रयोगशाळेतील सर्व नोंद वह्या )रसायने ,काचेचे साहित्य ,उपकरणे (अद्ययावत ठेवणे.
५. राज्य, विभागीय व जिल्हा स्तरावरून वेळोवेळी आयोजित केलेल्या प्रशिक्षणास उपस्थित राहणे .
६. प्रयोगशाळेच्या स्वच्छतेबाबत देखरेख करणे.

**प्रयोगशाळा मदतनीस  /मदतनीस**

१. प्रयोगशाळेमध्ये तपासणीसाठी प्राप्त होणारे पाणी नमुने जमा करून घेण्यास मदत करणे.
२. रसायनी तसेच जैविक तपासणी करत असताना रसायनी व अनुजीव तज्ञ यांना मदत करणे.
३. प्रयोगशाळा व उपकरणे स्वच्छ ठेवणे.
४. कार्यालयीन कामकाजात मदत करणे.

**सँपलिंग असिस्टंट :**

१. पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षण कार्यक्रमा अंतर्गत सर्व सार्वजनिक पिण्याच्या पाण्याचे स्रोतांचे तपासणीसाठी प्राप्त होणा-या व झालेल्या नमून्यांचे संनियंत्रण व नियोजन करणे.
२. प्रयोगशाळेसंबंधीत कामात मदत करणे.
३. प्रयोगशाळेच्या कार्य क्षेत्रातील प्राथमिक आरोग्य केंद्र व ग्रामपंचायत यांच्याशी समन्वय साधणे.
४. राज्य, विभागीय व जिल्हा स्तरावरून वेळोवेळी आयोजित केलेल्या प्रशिक्षणास उपस्थित राहणे .
५. राज्य, विभागीय व जिल्हा स्तरावरून वेळोवेळी देण्यात येणाऱ्या पाणी गुणवत्तेसंबंधी सूचनांचे पालन करणे.

## परिशिष्ट : ४

## ओळखपत्राचा नमुना

**कार्यालयाचे नाव व पत्ता**

राजमुद्रा

**नाव ------------------------**

**पदनाम -------------------**

छायाचित्र

**रक्तगट --------------------**

**करार कालावधी --------**

**धारकाची सही     आस्थापना अधिकारी**

**कंत्राटी तज्ञ / कर्मचाऱ्याचे ओळखपत्र**

१) हे ओळखपत्र जपून ठेवावे.

२) या ओळपत्राचा गैरवापर केल्यास शिस्तभंगाची कारवाई करण्यात येईल.

३) ओळखपत्र हरविल्यास ताबडतोब आस्थापना अधिकाऱ्यांना कळवावे.

४) कर्मचाऱ्याचा करार कालावधी संपुष्टात आल्यास अथवा सेवा सोडल्यास अथवा सेवा संपुष्टात आणल्यास हे ओळखपत्र संबंधित कार्यालयास परत करावे.

५) हे ओळखपत्र सापडल्यास कृपया संबंधित कार्यालयाकडे पाठवावे.

## परिशिष्ट : ५

## प्रयोगशाळेत तपासण्यात येणारे घटक

| Sr. No | Parameters | District / Sub Div. Lab |
|---|---|---|
| **Physical Parameters** | | |
| 1 | Temperature | Yes |
| 2 | Colour | Yes |
| 3 | Odour | Yes |
| 4 | Taste | Yes |
| 5 | Turbidity | Yes |
| 6 | pH | Yes |
| **Chemical Parameters** | | |
| 7 | TDS/Elect. Conductivity | Yes |
| 8 | Total Alkalinity | Yes |
| 9 | Chloride | Yes |
| 10 | Fluoride | Yes |
| 11 | Nitrate | Yes |
| 12 | Sulphate | Yes |
| 13 | Total Hardness | Yes |
| **Heavy Metals** | | |
| 14 | Iron | Yes |
| **Bacteriological Parameters** | | |
| 15 | Total Colifom | Yes |
| 16 | E-Coli / Thermotolerant | Yes |
| 17 | Free Residual Chlorine | Yes |